**सोलापूर जिल्हयातील कॉ.गोदुताई परुळेकर महिला विडी कामगार सहकारी गृहनिर्माण संस्था, मर्यादित या संस्थेतील अ-ब-क या संस्थांना केंद्र शासनाएवढे अनुदान देण्याबाबत..**

**महाराष्ट्र शासन,**
गृहनिर्माण विभाग,
शासन निर्णय, क्रमांक : संकिर्ण-२००२/प्र.क्र.११२/गृनिधो-१,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : १६ जानेवारी,२००३.

**वाचा :** १) गृहनिर्माण विभाग, शासन निर्णय, क्रमांक एचएसजी १०९७/ प्र.क्र.१९७/ गृनिधो-१, दिनांक १२ जुलै, २००१,
२) केंद्र शासन, श्रम मंत्रालयाचे पत्र क्रमांक : एम११०१८/१६/९९/डब्ल्यू III, दिनांक ८ ऑगस्ट,२००२,
३) वित्त नियंत्रक महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण यांचे पत्र क्रमांक प्राधिक/विनि३.११/कॉ.गो.प./३३२९, दिनांक १७ सप्टेंबर,२००२,
४) गृहनिर्माण विभाग, शासन निर्णय, क्रमांक -वाटप २००२/प्र.क्र.१००/ अर्थसं-१, दिनांक १९.६.२००२.

**शासन निर्णय :** आर्थिकदृष्टया दुर्बल घटकातील विडी कामगारांचे जीवनमान उंचावले जावे या हेतूने शासनाकडून विडी कामगारांच्या घरकुलांसाठी केंद्र शासन ज्या विडी कामगारांच्या घरकुलास रु. २०,०००/- आर्थिक सहाय्य देते अशा विडी कामगारांना राज्य शासनाकडून प्रतिघरकुल रु.२०,०००/- केंद्र शासनाच्या निकषाप्रमाणे आर्थिकसहाय्य देण्याबाबतचा निर्णय वरिल संदर्भ क्रमांक १ नुसार घेण्यांत आलेला आहे.

सोलापूर जिल्हयातील कॉ.गोदुताई परुळेकर महिला विडी कामगार सहकारी गृहनिर्माण संस्था, मर्यादित या संस्थेतील अ-ब-क या संस्थेस घरकुल योजनेसाठी पाचव्या टप्प्यात रु. ८८,६८,०००/- इतके अनुदान म्हणून केंद्र शासनाने संदर्भ क्रमांक २ अन्वये मंजूर केलेले आहे. यास्तव सोलापूर जिल्हयातील कॉ.गोदुताई परुळेकर महिला विडी कामगार सहकारी गृहनिर्माण संस्था, मर्यादित या संस्थेतील अ-ब-क या संस्थेस घरकुल योजनेसाठी केंद्र शासनाप्रमाणे राज्य शासनाचा पाचवा हप्ता म्हणून उपलब्ध तरतुदीमधून रु. ८८,६८,०००/- (रु. अठ्ठयाऐंशी लाख अडुसष्ट हजार फक्त) इतके अनुदान खालील अटींच्या अधिन राहून वितरीत करण्यास या शासन आदेशान्वये

मंजूरी देण्यांत येत आहे. उपरोक्त रक्कम खर्च करण्यास सन २००२-२००३ या वर्षात तरतूद उपलब्ध आहे.

सदर रक्कम महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरणामार्फत वितरीत करण्यांत येईल. प्राधिकरणाने सदरचा खर्च करण्यासाठी अवर सचिव, गृहनिर्माण विभाग (आहरण व संवितरण अधिकारी) यांच्या प्रतीस्वाक्षरीसह सदर रक्कमेचे देयक अधिदान व लेखा कार्यालयात विहित प्रपत्रात सादर करावे व मंजूर तदतूद संस्थेस वितरीत करावी.

महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरणास या योजनेंतर्गत बांधकाम होत असलेल्या घरांच्या प्रगतीबाबत नियंत्रण ठेवण्यास प्राधिकृत करण्यात आलेले आहे. त्यांनी अनुदानातून बांधकाम होते किंवा कसे याची सविस्तर माहिती ठेवणे आवश्यक राहील. तसेच बांधकामाच्या प्रगतीचा अहवाल विहित नमुन्यात शासनास सादर करणे आवश्यक राहील.

ज्या कारणासाठी अनुदान घेण्यांत आले आहे त्याच कारणासाठी त्याचा विनियोग करणे आवश्यक आहे.

महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्र विकास प्राधिकरणास योजनेंतर्गत होणाऱ्या खर्चाबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करणे बंधनकारक राहील. जर वितरीत केलेली रक्कम घरकुल योजनेसाठी वापरली नाही तर सदर रक्कम प्राधिकरणाने व्याजासह वसूल करावी.

या अनुदानाविषयीचे लेखे जर केंद्र शासन /महालेखापाल यांनी मागविल्यास ते त्यांच्या माहितीकरिता/पहाणीकरीता सादर करण्यांत यावेत.

संदर्भ क्रमांक ४ येथील आदेशान्वये सन २००२-२००३ या वर्षाकरीता मंजूर असलेल्या तरतूदीमधून या प्रित्यर्थ होणारा खर्च मागणी क्र.क्यू-३ मुख्य लेखा शिर्ष २२१६- गृहनिर्माण ८० - सर्वसाधारण - १०३ गृहनिर्माण मंडळे इत्यादींना सहाय्य - पंचवार्षिक योजनांतर्गत योजना - (०३)(०८) विडी कामगारांना घरकुलासाठी अनुदान (२२१६-१२०२), ४३ अर्थसहाय्य अनुदाने या लेखा शिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा. सदरची रक्कम सोलापूर जिल्हयातील कॉ.गोदुताई परुळेकर महिला विडी कामगार सहकारी गृहनिर्माण संस्था, मर्यादित या संस्थेतील अ-ब-क या संस्थेस घरकुल योजनेसाठी या संस्थेस वितरीत करण्यात यावी.

सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक -१०४६/व्यय-३, दि.१.१०.२००२ व अर्थोपाय अनौपचारिक संदर्भ क्र.३०८/०२/अर्थोपाय/ २००२ दिनांक १०.१०.२००२ अन्वये १/४ पेक्षा अधिक रक्कम खर्च करण्यास दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने,

**(व.दा.राठोड)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन..

प्रत,

१) महालेखापाल, महाराष्ट्र-१, (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई,
२) महालेखापाल, महाराष्ट्र-१, (लेखा परीक्षा) मुंबई,
३) महालेखापाल, महाराष्ट्र-२, (लेखा व अनुज्ञेयता) नागपूर,
४) महालेखापाल, महाराष्ट्र-२, (लेखा परीक्षा) नागपूर,
५) मा.प्रधान सचिव, नियोजन, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
६) मा.प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
७) मा.प्रधान सचिव, कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
८) उपाध्यक्ष व मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण, गृहनिर्माण भवन, वांद्रा (पूर्व), मुंबई ४०० ०५१,
९) मुख्य अधिकारी, पुणे गृहनिर्माण व क्षेत्रविकास मंडळ, आगरकरनगर,पुणे-१,
१०)वित्त नियंत्रक, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण, गृहनिर्माण भवन, वांद्रा (पूर्व), मुंबई ४०० ०५१,
११)अधिदान व लेखा आधिकारी, मुंबई/बांद्रा,
१२) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
१३) अवर सचिव (रोख शाखा/अर्थसं-१) गृहनिर्माण विभाग, मंत्रालय,मुंबई-३२,
१४) कार्यासन अधिकारी, वित्त विभाग, व्यय-३, अर्थोपाय/अर्थसंकल्प ३ व १६, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
१५) चेअरमन, सोलापूर जिल्हयातील कॉ.गोदुताई परुळेकर महिला विडी कामगार सहकारी गृहनिर्माण संस्था, मर्यादित या संस्थेतील अ-ब-क या संस्था, १७८२, दत्तनगर, सोलापूर ४१३ ००५,
१६) निवड नस्ती, गृनिधो-१, गृहनिर्माण विभाग, मंत्रालय, मुंबई -३२,

...........